**माहिती व जनसंपर्क महासंचालनालय व अधिनस्त कार्यालयातील वाहनचालक गट-क संवर्गातील १० पदांच्या सेवा बाह्ययंत्रणेद्वारे घेण्याच्या प्रस्तावास मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्र. मावज २०२२/१९४/प्र.क्र.६९/३४-अ**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक:- २६ जून, २०२३

**संदर्भ :-** १) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्र: मावज २०२०/१२२/ प्र.क्र. ३२/का-३४ अ, दिनांक २ मार्च, २०२१.
२) वित्त विभाग, शासन निर्णय, क्र. -पदनि-२०२२/प्र.क्र.१५/आ.पु.क, दि. २७.०४.२०२२.
३) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्र. मावज २०२२/२५४/ प्र.क्र. ६९ (भाग-२)/का ३४-अ, दि.३१ मे, २०२२.
४) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्र. मावज २०२२/१९४/ प्र.क्र. ६९ /का ३४-अ, दि. २१ जून, २०२२.
५) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्र. मावज २०१६/ प्र.क्र. ८२ / भाग-३/का ३४-अ, दि. १८ जुलै, २०२२.
६) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्र. मावज २०२२/१९४/ प्र.क्र. ६९ /का ३४-अ, दि. ८ फेब्रुवारी, २०२३.

**प्रस्तावना :-**

माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाकडील प्रसिध्दीच्या कामकाजाचे तातडीचे स्वरुप पाहता, तसेच वाहनांची असलेली निकड, मा. मुख्यमंत्र्यांच्या प्रत्येक कार्यक्रमांच्या प्रसिध्दी पथकास (Convoy) वाहनांची असणारी आवश्यकता व मा. मुख्यमंत्री, मा. मंत्री, मा. राज्यमंत्री यांची प्रसिध्दीची कामे लवकरात लवकर पूर्ण करणे या बाबी विचारात घेता माहिती व जनसंपर्क महासंचालनालय व अधिनस्त कार्यालयातील वाहनचालकांची ६ पदे संदर्भ क्र. १ येथील दिनांक २ मार्च, २०२१ च्या शासन निर्णयान्वये बाह्ययंत्रणेव्दारे भरण्यास मान्यता प्रदान करण्यात आली होती. तद्नंतर संदर्भ क्र. ३ वरील दिनांक ३१ मे, २०२२ च्या शासन निर्णयान्वये त्यास २ महिन्याची मुदतवाढ देण्यात आली आहे, तद्नंतर वाहनचालकांची १० पदे संदर्भ क्र. ४ येथील दिनांक २१/०६/२०२२ च्या शासन निर्णयान्वये ६ महिने अथवा सुधारीत आकृतीबंध अंतिम होईल, यापैकी जे अगोदर घडेल त्या कालावधीपर्यंत बाह्ययंत्रणेव्दारे भरण्यास मंजूरी देण्यात आली होती. तद्नंतर संदर्भ क्र. ५ येथील दिनांक १८ जुलै, २०२२ च्या शासन निर्णयान्वये माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाच्या १००३ नियमित पदांचा सुधारित आकृतिबंध मंजूर झाला आहे. तद्नंतर संदर्भ क्र. ६ येथील दिनांक ८ फेब्रुवारी, २०२३ च्या शासन निर्णयान्वये उपसमितीने दिनांक ०७/०६/२०२२ रोजीच्या बैठकीत दिलेल्या मान्यतेनुसार दिनांक ०१/०२/२०२३ पासून ते दिनांक ०६/०५/२०२३ पर्यंत अथवा सरळसेवेने उमेदवार उपलब्ध होईपर्यंत यापैकी जे अगोदर घडेल त्या कालावधीपर्यंत

पदे भरण्यास मंजुरी दिली होती. तथापि, माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाकडील प्रसिध्दीच्या कामकाजाचे तातडीचे स्वरुप पाहता, तसेच वाहनांची असलेली निकड, मा. मुख्यमंत्र्यांच्या प्रत्येक कार्यक्रमांच्या प्रसिध्दी पथकास (Convoy) वाहनांची असणारी आवश्यकता व मा. मुख्यमंत्री, मा. मंत्री, मा. राज्यमंत्री यांची प्रसिध्दीची कामे लवकरात लवकर पूर्ण करणे तसेच सदर पदे सरळसेवेने भरण्यास लागणारा कालावधी या बाबी विचारात घेता, वाहनचालकांच्या १० पदांच्या सेवा बाह्ययंत्रणेद्वारे घेण्याच्या प्रस्तावास दिनांक ०७/०५/२०२३ पासून पुढे मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

माहिती व जनसंपर्क महासंचालनालयातील वाहनचालक, गट-क या संवर्गातील १० पदांच्या सेवा बाह्ययंत्रणेद्वारे घेण्याच्या प्रस्तावास वित्त विभागाच्या शासन निर्णय दिनांक ०९/०६/२०१७ अन्वये गठीत अप्पर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग व सचिव (व्यय), वित्त विभाग यांच्या उपसमितीने दिनांक ०७/०६/२०२३ रोजीच्या बैठकीत, वाहनचालक गट-क या संवर्गातील १० रिक्त पदे नियमित भरण्यात येईपर्यत किंवा ६ महिने यापैकी जे अगोदर घडेल त्या कालावधीपर्यत मुदतवाढ दिली आहे. त्यामुळे वाहनचालक, गट-क या संवर्गातील १० रिक्त पदे दिनांक ०७/०५/२०२३ पासून ते दिनांक ०६/११/२०२३ पर्यत अथवा सरळसेवेने उमेदवार उपलब्ध होईपर्यत यापैकी जे अगोदर घडेल त्या कालावधीपर्यंत बाहययंत्रणेद्वारे (मे. कृष्णा मोटर्स, जोगेश्वरी, मुंबई यांच्यामार्फत ) भरण्यास मुदतवाढ देण्यात येत आहे.

०२. सदर पदांची भरती करतांना वित्त विभागाच्या दिनांक २७/०४/२०२२ मध्ये नमूद केलेल्या परिपत्रकातील सूचनांचा अवलंब करण्यात यावा.

०३. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ३४८४, दिनांक ३१/०५/२०२३ अन्वये दिलेल्या मंजूरीच्या अधीन राहून तसेच अप्पर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग व सचिव (व्यय), वित्त विभाग यांच्या उपसमितीने दिनांक ७ जून, २०२३ च्या बैठकीत दिलेल्या मंजूरी नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

०४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२३०६२६१८३९४४९७०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DEEPALI PATHAK

Digitally signed by DEEPALI PATHAK
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=245ec1be5f40ed10b626817ad30a304c166dfdaf8cfc319c79bbe3e5015ee80d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=33F1FFF2431345C1855F0CF55F805FE479712905981CC867AA66332A9FB5C6D5, cn=DEEPALI PATHAK
Date: 2023.06.26 18:42:21 +05'30'

( दीपाली पाठक )

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. प्रधान सचिव (मा. व ज.) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२,
२. महालेखापाल, महाराष्ट्र -१ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई-४०००२०,
३. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई-४०००३२,

४. संचालक (माहिती) (प्रशासन), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई-४०००३२,
५. उपसंचालक (माहिती) (प्रशासन), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय,मंत्रालय, मुंबई-४०००३२,
६. उप संचालक (लेखा), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई-४०००३२,
७. अवर सचिव (कार्यासन आ.पु.क), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई -४०००३२,
८. निवड नस्ती.